अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी यांच्या कार्यालयीन कामकाजासाठी चारचाकी वाहन भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.२१५/प्रशा-२

गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: ०३ ऑगस्ट २०२३

**वाचा:-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
२) उद्योग़ ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र: भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दिनांख २८.०७.२०२०.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: शापसे-३४२२/प्र.क्र.७८/का.३१, दिनांक ०१.०६.२०२३.
५) आयुक्त,वै.शि. यांचे पत्र क्र. डीएमईआर-२२०११/१९७/२०२३-प्रोक१, दिनांक २६.०७.२०२३.

**प्रस्तावना:-**

अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी यांना त्यांच्या कार्यालयीन कामकाजाकरीता भाडेतत्वावर चारचाकी वाहन उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संचालनालयाच्या संदर्भ क्र. ५ वरील पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला आहे. परभणी येथे नवीन स्थापन शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाच्या अधिष्ठाता यांना अद्याप वाहन उपलब्ध करुन देण्यात आलेली नाही. यास्तव सदर संस्थेच्या अधिष्ठातांना त्यांच्या कार्यालयीन कामकाजाकरीता चारचाकी वाहन भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी यांच्या दैनंदिन शासकीय कामकाजाकरीता संदर्भ क्र. ४ वरील सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ०१.०६.२०२३ अन्वये निश्चित पुरवठादार संस्थांच्या पॅनलमधील एका पुरवठादार संस्थेकडून सदर शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र-अ” मधील अनु क्र. १ व २ मध्ये नमुद वाहनांपैकी कोणतेही एक वाहन निश्चित करण्यात आलेल्या दरसूचीनुसार भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास व त्यासाठी येणा-या

रुपये ६,३६,०००/- (करांशिवाय) एवढ्या वार्षिक खर्चास तसेच त्यावरील अनुज्ञेय कर अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाहनाच्या भाड्यापोटी येणारा वार्षिक खर्च संबंधित संस्थेच्या २२१०एच५६१ या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्षात (१३) कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग दोन, अनुक्रमांक-१३, नियम क्र. ६० व ६१ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३१६२९१३८६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO
JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.08.03 04:04:53 -07'00'

**(म. गि. जोगदंड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, परभणी.
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. निवडनस्ती (प्रशा-२).